**महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) या संवर्गातील उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदावर सरळसेवेने (एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम- ४ द्वारे) रूजू झालेल्या अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत बदल करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : नियुक्ती-३५१९/प्र.क्र.२१०/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : १५ सप्टेंबर, २०२०

वाचा :-

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २० जानेवारी, २०१४
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : नियुक्ती-३५१९/प्र.क्र.२१०/प्रशा-२, दिनांक १३ नोव्हेंबर, २०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने राज्यसेवा (मुख्य) परीक्षा- २०१५ व २०१६ च्या आधारे शिफारस केलेल्या व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम- ४ अंतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट-ब या संवर्गातील उमेदवारांकरिता शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्त्याखालील आस्थापनेवर दिनांक १३ नोव्हेंबर, २०१९ च्या शासन आदेशान्वये पदस्थापना देण्यात आली आहे. सदर नियुक्ती आदेशाच्या अनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने दिनांक १५ जून, २०१७ च्या अधिसूचनेद्वारे महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप (दुसरी सुधारणा) नियम, २०१७ अधिसूचित करण्यात आला आहे. त्यानुसार नियम ६(अ)(१) मध्ये नमूद केल्याप्रमाणे महसूली विभागनिहाय उपशिक्षणाधिकारी व तत्सम संवर्गातील रिक्त पदांची स्थिती उमेदवारांना कळवून महसूल विभाग वाटप करण्यासाठी विकल्प विचारण्यात आला होता. श्री. रविंद्र सावंत यांनी नियम-७ खाली पुणे महसूली विभाग वाटप करण्याबाबत विकल्प सादर करून सोबत अपंगत्वाचे प्रमाणपत्र जोडले होते. परंतु श्री. रविंद्र आबासाहेब सावंत यांची नियुक्ती खेळाडू प्रवर्गातून झाली असून अपंग प्रवर्गातून झालेली नाही. नागरी सेवा मंडळाची दिनांक २४ ऑक्टोबर, २०१९ रोजी पार पडलेल्या बैठकीत श्री. रविंद्र सावंत यांना तात्पुरत्या स्वरूपात नागपूर महसूल विभाग हा चक्राकार पध्दतीने वाटप करण्यात आला असून, अपंगत्वाचे प्रमाणपत्र Board of Referees यांच्याकडून प्राप्त झाल्यानंतर त्यांची महसूल विभाग वाटप नियम ७ अंतर्गत नियुक्ती करण्यात यावी अशी शिफारस नागरी सेवा मंडळाने केली होती. नागरी सेवा मंडळाच्या

शिफारशीनुसार दिनांक १३.११.२०१९ रोजीच्या आदेशान्वये श्री. सावंत यांची तात्पुरत्या स्वरुपात गटशिक्षणाधिकारी, पंचायत समिती वर्धा, जि.वर्धा पदावर पदस्थापना देण्यात आली. तसेच श्री. रविंद्र सावंत यांनी सादर केलेले अपंगत्वाचे प्रमाणपत्र Board of Referees यांच्याकडून प्रमाणित करून घेण्यासाठी संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, सेंट जॉर्जेस हॉस्पिटल आवार, मुंबई यांच्याकडे दिनांक २२ नोव्हेंबर, २०१९ च्या पत्रान्वये पाठविण्यात आले होते. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे दिनांक २०.०७.२०२० रोजीचे पत्रासोबत सर ज. जी. समूह रूग्णालय, मुंबई यांच्या दिनांक १६.०४.२०२० रोजीच्या पत्रान्वये श्री. सावंत यांच्या अपंगत्वाचा अहवाल प्राप्त झाला आहे.

२. अधीक्षक, सर ज. जी. समूह रूग्णालय, मुंबई यांनी श्री. रविंद्र आबासाहेब सावंत यांची दिनांक २.०३.२०२० रोजी वैद्यकीय मंडळातर्फ तपासणी करण्यात आली असून, त्यांच्या श्रवण शक्तीतील दोष ४५% असल्याचे नमूद केले आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, यांच्या दिनांक ३ ऑगस्ट, २०१० रोजीच्या शासन निर्णयानुसार अपंगत्वाचे फायदे घेण्यासाठी अपंगत्वाचे प्रमाण ४० ते ६० टक्के असणे आवश्यक आहे.

३. श्री. रविंद्र सावंत हे "श्रवण शक्तीतील दोष" या अपंगत्वाच्या व्याख्येत मोडत असल्याने त्यांनी मागणी केल्याप्रमाणे त्यांना पुणे महसूल विभाग देय होतो. सबब श्री. सावंत यांना दिनांक १३ नोव्हेंबर, २०१९ रोजीच्या शासन आदेशान्वये वाटप करण्यात आलेला नागपूर महसूल विभागात बदल करुन पुणे महसुली विभागात पदस्थापना देणे आवश्यक ठरते.

**शासन आदेश :-**

उक्त वस्तुस्थितीच्या अनुषंगाने श्री. रविंद्र आबासाहेब सावंत यांना देण्यात आलेल्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या स्तंभ क्रमांक ५ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी पदस्थापना देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **अधिकाऱ्यांचे नाव** | **दिनांक १३.११.२०१९ रोजीच्या आदशान्वये वाटप करण्यात आलेला महसूली विभाग व पदस्थापना** | **अंशत: बदल करुन वाटप केलेल्या महसूल विभाग** | **पदस्थापनेचे ठिकाण** |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १. | श्री. रविंद्र आबासाहेब सावंत | नागपूर<br>गटशिक्षणाधिकारी,<br>पं. स. वर्धा, जि. वर्धा | पुणे | गटशिक्षणाधिकारी,<br>पं. स. करवीर ,<br>जि. कोल्हापूर |

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा. तसेच आयुक्त (शिक्षण), पुणे यांनी संदर्भाधीन आदेशात नमूद केल्याप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होतील याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२००९१५१८०५१६५५२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd30ed620a4fe01f24cb84cc86e70f3b8f6f1fdcdb2469570c78dabb9acf4ba, postalCode=400032, street=ROOM NO 4.4,ANNEX BLDG,SCHOOL EDUCATION DEPT.MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2020.09.15 18:06:59 +05'30'

**(दीपक शेलार)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
३. संबंधित संचालक
४. उप सचिव (सीपीटीपी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक,
६. संबंधित शिक्षणाधिकारी
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / पुणे
८. संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी अग्रेषित,**

१) मा. मंत्री (शा.शि.व क्री.) यांचे विशेष कार्य अधिकारी
२) अपर मुख्य सचिव (शा.शि. व क्री. विभाग) यांचे स्वीय सहायक
३) निवडनस्ती